बालकांसाठी चाचा नेहरु बाल महोत्सव आयोजित करण्यासाठी निधी उपलब्ध करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१८/प्र.क्र.१०६/का-०३**
नवीन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- १५ ऑक्टोबर, २०१९

**वाचा :-** १) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्रमांक- बालगृ-२०१२/प्र.क्र.१६४/का-०३, दि. ०४.१२.२०१२ .
२) शासन परिपत्रक ,वित्त विभाग ,क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३,दि.०८.०७.२०१९.

**प्रस्तावना :-**

राज्यातील सर्व मुले व प्राधान्याने बाल कल्याण क्षेत्रात कार्यरत असलेल्या शासकीय/स्वयंसेवी संस्थामध्ये पुनर्वसनासाठी दाखल झालेल्या अनाथ, निराधार, उन्मार्गी मुलांमधील सुप्त गुणांना वाव देऊन त्यांच्यात एकमेकांविषयी बंधुभाव, सांघिक भावना निर्माण होण्यासाठी दरवर्षी ३६ जिल्ह्यांमध्ये व ६ विभागीय स्तरावर नोव्हेंबर महिन्याच्या दुस-या आठवड्यात चाचा नेहरू बाल महोत्सव आयोजित करण्यास संदर्भाधीन क्र. १ च्या दि. ०४.१२.२०१२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली असून त्याकरीता रु. २, ०९,९५००० /- इतक्या खर्चास मंजूरी देण्यात आली आहे. सन २०१९-२० या आर्थिक वर्षामध्ये मुलांसाठी चाचा नेहरु बाल महोत्सव आयोजित करणे या योजनेसाठी - २२३५बी -३२५, ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली रु. २,१५,००,०००/- इतका निधी अर्थ संकल्पीत करण्यात आला असून त्यापैकी, वित्त विभागाने बीडीस प्रणालीवर वितरीत केलेली ६० टक्के मर्यादेतील तरतूद आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना वितरित करणेबाबत प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यावर शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील सर्व मुले व प्राधान्याने बाल कल्याण क्षेत्रात कार्यरत असलेल्या शासकीय/ स्वयंसेवी संस्थामध्ये पुनर्वसनासाठी दाखल झालेल्या अनाथ, निराधार, उन्मार्गी मुलांमधील सुप्त गुणांना वाव देऊन त्यांच्यात एकमेकांविषयी बंधुभाव, सांघिक भावना निर्माण होण्यासाठी संदर्भाधीन दिनांक ०४.१२.२०१२ मधील शासन निर्णयातील तरतुदींनुसार चाचा नेहरु बाल महोत्सव आयोजित करणे या योजनेंअंतर्गत उपलब्ध करुन द्यावयाच्या निधीमधून २२३५बी -३२५,३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली ६० टक्के मर्यादेतील तरतूद रु. १,२९,००,००० (अक्षरी रुपये एक कोटी, एकोणतीस लक्ष फक्त) इतका निधी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. याकरीता आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे हे नियंत्रक अधिकारी राहतील. नियंत्रक अधिकारी यांनी सदर निधी विहित नियमानुसार संबंधीत विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास व जिल्हा महिला विकास अधिकारी यांना आहरीत करण्यासाठी उपलब्ध करावा व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

३ सन २०१९-२० साठीचा निधी खर्च करतांना वित्त व नियोजन विभागाने वेळोवेळी निर्गमीत केलेले आदेश, सूचना, परिपत्रके, अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच हा खर्च मागणी क्रमांक एक्स-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण,१०२ बाल कल्याण, (०५) (०४) मुलांसाठी चाचा नेहरू बाल महोत्सवाचे आयोजन (२२३५बी३२५) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या वित्तीय वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८.०७.२०१९अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१९१०१६११५००६९९३० असा आहे. सदरचा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sandhya Sudhir Gawas

Digitally signed by Sandhya Sudhir Gawas
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9af004e92d57921adf37df245e6a4d654bc630fcd0b0e13d1dd766b546c90f61, serialNumber=bfcea34b3e67580078284e564299f1fb5f9606206bcc59992327334b4690771c, cn=Sandhya Sudhir Gawas
Date: 2019.10.16 11:52:57 +05'30'

**( सं. सु. गवस )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२)महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई / नागपूर.
३) महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा ), मुंबई / नागपूर.
४)अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६) जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर.
७) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) अवर सचिव (का-४), महिला व बाल विकास विभाग मंत्रालय, मुंबई यांना सदर निधी बी. डी एस. प्रणालीवर वितरीत करण्याच्या विनंतीसह अग्रेषित.
१०) निवड नस्ती, का-३.